वारणा दगडी धरणामधुन होणारी गळती धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने अनुज्ञेय प्रमाणात आणण्यासाठी धरणाच्या गळती प्रतिबंधक उपाययोजनांची कामे करणे या दुरुस्तीचे कामास विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्र. प्रमाप्र : २०२१/(प्र.क्र.२०६/२१)/सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

**दिनांक : २७.०१.२०२२**

वाचा :

१. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. मकृखोविम-१६/(८२/२०२१)/सिंव्य-४/२४०२/२०२१दि. ३१.०५.२०२१ व २६०१/२०२१ दि. ११.०६.२०२१.

२. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि. २६.०५.२०१७

३. शासन निर्णय क्र. २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि. ३१.०८.२०१८

४. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र. ५५१/१७/सिंव्य(कामे) दि. २७.११.२०१८

प्रस्तावना :

वारणा प्रकल्पाचे काम प्रत्यक्षात सन १९७६ पासून सुरू करण्यात आले असून धरणाचे काम सांडव्यावरील वक्रद्वार उभारणीसह सन २००२ मध्ये पूर्ण करण्यात आले. त्यामुळे धरणात ९७४.२१ दलघमी (३४.४० टीएमसी) इतका प्रकल्पीय पाणीसाठा निर्माण झाला. त्यामध्ये ७७९.३४ दलघमी (२७.५२२ टीएमसी) इतका उपयुक्त पाणीसाठा आहे.

वारणा प्रकल्पास ऑक्टोबर २०१६ मध्ये रु. ११७४.९८ कोटी किमतीस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता मिळाली आहे. मार्च २०२० अखेर रु. ८५०.२८ कोटी इतका खर्च झाला आहे. मंजूर तृतीय सुप्रमा प्रमाणे प्रकल्पाची उर्वरित किंमत रु. ३२४.७० कोटी इतकी आहे. तृतीय मंजूर सुप्रमामध्ये प्रथम शीर्षाखाली रु. २०४.७५ कोटी इतकी तरतूद असून रु. १९१.७० कोटी इतका खर्च झाला आहे.

वारणा नदीच्या पात्रामध्ये मातीचे धरण असून धरणाची एकूण लांबी १५८० मी. इतकी आहे. यापैकी मधील ८३१.५० मी. हा भाग माती धरणाचा आहे. उर्वरित दोन्ही तीरावर ७४८.५० मी. लांबी मध्ये दगडी धरण बांधण्यात आले आहे.

डाव्या तीरावरील दगडी धरणाची लांबी (NOF) एकूण ४०३ मी. आहे. तसेच उजव्या तीरावरील दगडी धरणाची लांबी (OF) एकूण ३४५.५० मी. इतकी आहे. उजव्या तीरावरील बांधकामामध्ये सांडव्याचे बांधकाम विमोचक (construction sluice) व उजवा तीर कालवा सिंचन विमोचक असून डाव्या तीरावरील दगडी बांधकामामध्ये उच्च स्तर/निम्न स्तर सिंचन विमोचक व विद्युत विमोचक यांचा समावेश आहे.

धरणाच्या दोन्ही तिरावरील दगडी धरणामध्ये डाव्या तीरावर १० व उजव्या तीरावर १२ मोनोलिथ आहेत. त्यामध्ये निरीक्षण गॅलरी व Foundation Gallery ची रचना करण्यात आली आहे. धरणाच्या खालील डाव्या बाजूस २ X ८ मेगावॅट क्षमतेचे विद्युत गृह आहे.

धरणापासून निघणारा वारणा डावा कालवा किमी १ ते ७० असून २७ मधून दुफाट्याद्वारे वारणा जलसेतू मधून वारणा नदी ओलांडून पलीकडे कोल्हापूर जिल्ह्यात जाणारा १ ते ६० किमी लांबीचा उजवा कालवा आहे.

सध्यस्थितीत वारणा डावा कालवा किमी १ ते ३८ व उजवा कालवा किमी १ ते ३० पर्यंत प्रवाही आहे. प्रकल्पाची प्रकल्पीय सिंचन क्षमता सांगली जिल्ह्यातील ४९१४० हे. व कोल्हापूर जिल्ह्यामध्ये ३७८६० हे. अशी एकूण ८७००० हे.(९१३५० हे. पीकक्षेत्र) असून जून २०२० अखेर ७१२७५ हे. (७४८३९ हे. पीकक्षेत्र) इतकी सिंचन क्षमता निर्माण झाली आहे.

वारणा दगडी धरणामध्ये सन १९८५ साली अंशत: पाणीसाठा करण्यात आला. त्यानंतर वक्राकार दरवाज्यासह धरणाचे काम पूर्ण झाल्यानंतर सन २००२ पासून पूर्ण क्षमतेने धरणांमध्ये पाणीसाठा करण्यात आला. धरणाच्या बांधकामास जवळजवळ ३५ वर्ष पूर्ण झाली असून दगडी धरणांमधून गळती सुरू आहे. त्यामुळे पाण्याचा नाश थांबविण्यासाठी धरण गळती प्रतिबंधक उपाययोजनेचे दुरुस्तीचे कामास विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

वारणा दगडी धरणामधून होणारी गळती धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने अनुज्ञेय प्रमाणात आणण्यासाठी धरणाच्या गळती प्रतिबंधक उपाय योजनांची विशेष दुरुस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत विशेष दुरुस्ती /विस्तार व सुधारणा अंतर्गत रु. ५४,८५,८३,६८३ (रु. चोपन्न कोटी पंच्याऐंशी लक्ष त्र्याऐंशी हजार सहाशे त्र्याऐंशी फक्त) किंमतीचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :**

१. शासन परिपत्रक क्र. २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि. ०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनांचे पालन करणे, अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. शासन पत्र दि. ०४.०६.२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसार निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादित राहण्यासाठी कामाचे दोन वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

३. तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण व संकल्पनांवर आधारित तरतूद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने, दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे यात तांत्रिक मान्यता प्रदान करताना त्यात बदल करण्यात येऊ नये.

५. प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम/तोडफोड याद्वारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करून बचत साधावी.

६. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

७. विषयांकित प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकातील तरतुदी, दर, वहन अंतर, संकल्पन व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

८. सदर प्र.मा. अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजुर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. तसेच प्रस्तावास प्रशासकीय मान्यतेची मंजुरी दिल्यानंतर पुन्हा सुधारित प्रशासकीय मान्यता देता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्त्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

९. सदर अंदाजपत्रकात १२% वस्तु व सेवा कर गृहित धरण्यात आला आहे. तथापि, जलसंपदा विभाग सामाईक दरसूची सन २०१७-१८ मधील सर्वसाधारण टिप्पणी मुद्दा क्र. अ) १) नुसार प्रत्यक्ष वस्तु व सेवा कराची परिगणना करावी व त्यानुसार सक्षम स्तरावर तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

१०. CWPRS, Pune यांनी घेतलेल्या चाचणी अहवालानुसार धरणाची घनता ही कमी झाल्याचे दिसून येते. याकरिता सदर धरणाची स्थैर्यता तपासणी करणे आवश्यक

आहे. यास्तव गळतीप्रतिबंधक कामे सुरु झाल्यावर धरणाची स्थैर्यता तपासणीचे काम हाती घ्यावे.

११. प्रस्तावित गळती प्रतिबंधक कामे सर्वच मोनोलिथला गृहीत धरलेले आहेत. याबाबत प्रत्यक्ष काम सुरु करण्यापूर्वी सक्षम स्तरावर गळतीची पाहणी करून त्यानंतरच कामाचा प्राधान्यक्रम ठरवून नियोजन करावे.

१२. प्रत्यक्ष काम करण्यापूर्वी धरणातील इतर embedment जसे Instrument, penstock इ. चा विचार करून आवश्यकतेप्रमाणे Drilling pattern/ location of holes सुधारित करण्याचा निर्णय सक्षम स्तरावर घ्यावा.

१३. CWPRS, Pune यांनी त्यांच्या अहवालात नमुद केल्यानुसार त्यांनी सुचविलेली Grouting methodology, grout mix इ. बाबींमध्ये प्रत्यक्ष काम सुरु झाल्यानंतर बदल केले जाणार आहेत. तेव्हा CWPRS, Pune यांनी काही बदल सुचविल्यास त्यांना प्रत्यक्ष कामापुर्वी पुन्हा एकदा सक्षम स्तरावर मान्यता घ्यावी लागेल.

१४. प्रत्यक्ष काम करण्यापूर्वी, तांत्रिक मान्यता निवीदा इ. पुर्वी पुन्हा दरसुचीबाह्य दरांना सक्षम स्तरावर मान्यता घेणे आवश्यक राहील.

१५. वारणा धरण कामांच्या संधानक व दगडी बांधकाम सुयोग्य दर्जाचे न झाल्याने धरणातून गळती होत आहे ही गंभीर बाब आहे त्यामुळे निकृष्ट दर्जाच्या बांधकामाबाबत जबाबदार असणारे अधिकारी व कंत्राटदार यांचेवर आवश्यक ती जबाबदारी निश्चितीची व अनियमिततेची कार्यवाही करण्याच्या दृष्टीने स्वतंत्र चौकशी समितीची स्थापना करून समितीच्या अहवालानुसार पुढील कार्यवाही करावी.

१६. प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (१२) विविध पाटबंधारे महामंडळांना भागभांडवली अंशदान (विस्तार व सुधारणा) १२ (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४७०१ जे १६७) (उर्वरित महाराष्ट्र) ५४, गुंतवणुका या लेखाशीर्षाखाली करावा मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि.२६/०५/२०१७ अन्वये विशेष दुरुस्ती कामास आंतरवित्त सल्लागार यांचे सहमतीने मान्यता देण्याबाबतचे अधिकार जलसंपदा विभागास आहेत.

त्याअनुषंगाने आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने व नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २०९/२०२१ दि. २९.११.२०२१ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ४४७/२०२१ दि.२०.१२.२०२१ नुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सि.व्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही सन २०२१-२२ मध्ये अ.क्र. ३९ वर नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२७१४५३०५६०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.01.28 12:00:56 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय,
४. मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. मा. सभापती/उपसभापती विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
६. मा. विरोधी पक्षनेते विधानसभा मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेते विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
८. मा. मंत्री जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा. राज्यमंत्री जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१० प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव ( प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा). महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१४. महालेखापाल २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य नागपूर.

१५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,

१६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे

१७. आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८.अधिक्षक अभियंता. कोल्हापूर पाटबंधारे मंडळ कोल्हापूर.

१९. कार्यकारी अभियंता, वारणा कळवा पाटबंधारे विभाग क्र. १ . इस्लामपूर.

२०. सि.व्य. (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्र. प्रमाप्र-२०२१/(प्र.क्र.२०६/२१)/सिंव्य(कामे)
## दि. २७.०१.२०२२ चे सहपत्र

ABSTRACT

| Sr.No. | Item | Cost (Rs) |
|---|---|---|
| १ | C-Works | ४६,९१,४९,८०० |
| २ | Royalty | ४३,६९,९१५ |
| ३ | १ % Insurance | ४६,९१,४९८ |
| ४ | १२ % GST | ५,६२,९७,९७६ |
| ५ | ३ % contegencies | १,४०,७४,४९४ |
|  | Total RS | ५४,८५,८३,६८३ |

Vaijnath
Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.01.28 12:01:10 +05'30'

( वैजनाथ चिल्ले )
शासनाचे उप सचिव